आदिवासी विकास विभागातील अधिकारी / कर्मचाऱ्यांच्या पदस्थापना, बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळे स्थापन करणेबाबत...

# महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः आस्था - २०१४/प्र.क्र. ५२/का.१५

**हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
तारीख: २१ मे,२०१५

**वाचा :-**

१) **शासन निर्णय क्रमांकः** सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र:एसआरव्ही-२०१४/ प्र.क्र.२६/१२, दि.१९/१/२०१५.
२) **शासन निर्णय समक्रमांक दि.४/०३/२०१४**

**शासन निर्णय:-**

संदर्भाधिन अ.क्र.२ येथे नमुद शासन निर्णय दि.४.०३.२०१४ अन्वये स्थापन करण्यात आलेल नागरी सेवा मंडळ (१) च्या रचनेमध्ये अंशत: बदल करण्यात येत आहे. सदर शासन निर्णयातील परिच्छेद १ मधील तक्त्यातील अ.क्र.३ येथे नमूद सदस्य, "अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव / सह सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग " यांच्याऐवजी, "सह सचिव / उप सचिव ( क्षेत्रिय आस्थापना), आदिवासी विकास विभाग " यांचा सदस्य म्हणून समावेश करण्यात येत आहे. यानुसार आता सुधारीत नागरी सेवा मंडळ (१) ची रचना खालीलप्रमाणे आहे.

**नागरी सेवा मंडळ (१)**

| अ.क्र. | सदस्य अधिकाऱ्यांचे पदनाम | मंडळावरील पदनाम |
|---|---|---|
| १ | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, आदिवासी विकास विभाग | अध्यक्ष |
| २ | आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक किंवा आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे | सदस्य |
| ३ | सह सचिव /उप सचिव (क्षेत्रिय आस्थापना ), आदिवासी विकास विभाग | सदस्य |

हे आदेश तात्काळ अमलात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५२२१११११८३३२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2015.05.22 11:14:30 +05'30'

**सु.ना.शिंदे**
उप सचिव

**प्रत,**

१. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
२. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
३. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक,
४. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,
५. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२,
६. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२,
७. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/नागपूर/अमरावती,
८. सर्व सह आयुक्त तथा उपाध्यक्ष, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समित्या,
९. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,
१०.सर्व उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
११.निवड नस्ती (का.१५)